# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र. बांधका-२१२२/प्र.क्र.३५८/पोल-७.**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १३ जून, २०२३.

विषय :- **फोर्स वन मुख्यालयाच्या हद्दीतील प्रशासकीय इमारतीचे मागील गेट ते बॅफल फायरिंग रेंज दरम्यान साधारणत १.५ कि.मी. लांबीचा व १८ ते २० फुट रुंदीचा पक्का डांबरी रस्ता जोते भिंत (Retaining wall) व भूमिगत गटार इ. कामे तयार करण्याकरिता रु.२,१८,८०,९५५/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशे यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

संदर्भ :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/प्र.क्र.४९/१४/विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९.
३) शासन परिपत्रक, सा.बां. विभाग, क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा.-२, दिनांक २५.०९.२०१९.
४) पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/१९-अे (२७)/ फायरिंग रेंज-डांबरी रस्ता/फोर्स वन/१४/२०२०, दिनांक ०८.१०.२०२१.
५) अपर पोलीस महासंचालक, फोर्स वन म.रा., मुंबई यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.फोर्स वन/पोनि मुख्या/ फायरिंग रेंज डांबरी रस्ता/फोर्स वन/२०२१/३०९०, दिनांक ११.०९.२०२१.
६) अधीक्षक अभियंता, मुंबई (सा.बां.) मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.अअ/मुंमं/प्रशा-१ / ४६३०, दिनांक ३०.०६.२०२१.

**शासन निर्णय-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाने संदर्भ क्र.४ च्या पत्राने अपर पोलीस महासंचालक, फोर्स वन, म.राज्य, मुंबई यांच्या संदर्भ क्र.५ येथील दि.०१/०९/२०२१ रोजीच्या पत्रान्वये **फोर्स वन मुख्यालयाच्या हद्दीतील प्रशासकीय इमारतीचे मागील गेट ते बॅफल फायरिंग रेंज दरम्यान साधारणत १.५ कि.मी. लांबीचा व १८ ते २० फुट रुंदीचा पक्का डांबरी रस्ता जोते भिंत (Retaining wall) व भूमिगत गटार इ. कामे करण्याकरिता** रक्कम **रु.२,१८,८०,९५५/- (रुपये दोन कोटी अठरा लाख ऐंशी हजार नऊशे पंच्चावन्न फक्त)** इतक्या खर्चाच्या **सहायक अभियंता श्रेणी-१, बांधकाम (सां.बा.) उप विभाग, अंधेरी (प),मुंबई यांनी** यांनी तयार केलेल्या पुढीलप्रमाणे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देऊन, निधी उपलबध करण्याची विनंती केली आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजपत्रकीय रक्कम | अंदाजपत्रक तयार करणा-या व्यक्तीचे पद. |
|---|---|---|---|
| १. | **फोर्स वन मुख्यालयाचे हद्दीतील पक्का डांबरी रस्ता / अनुषंगिक गटर बांधकाम संरक्षक भिंत बांधकाम व सर्वेक्षण.** | **रु.२,१८,८०,९५५/-** | **अंदाजपत्रक सहायक अभियंता श्रेणी-१, बांधकाम (सां.बा.) उप विभाग, अंधेरी (प), मुंबई यांनी सन २०२१-२२ च्या दरसूचीनुसार तयार केले असून कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सा.बा.) विभाग, अंधेरी (प), मुंबई व अधिक्षक अभियंता, मुंबई (सा.बा.) मंडळ, मुंबई यांनी साक्षांकित केले आहेत.** |

२. उक्त खर्चाचे अंदाज हे **सहायक अभियंता श्रेणी-१, बांधकाम (सां.बा.) उप विभाग, अंधेरी (प),मुंबई यांनी सन २०१९-२० च्या दरसूचीनुसार तयार केले असून कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सा.बा.) विभाग, अंधेरी (प), मुंबई व अधिक्षक अभियंता, मुंबई (सा.बा.) मंडळ, मुंबई** यांनी स्वाक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे **मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी** तपासले असून ते **रु.२,१८,८०,९५५/- (रुपये दोन कोटी अठरा लाख ऐंशी हजार नऊशे पंच्चावन्न फक्त)** असे अंतिम करुन त्यास **तांत्रिक मान्यता प्रदान** केली आहे.

४. त्या अनुसार, **फोर्स वन मुख्यालयाचे हद्दीतील प्रशासकीय इमारतीचे मागील गेट ते बॅफल फायरिंग रेंज दरम्यान साधारणत १.५ कि.मी. लांबीचा व १८ ते २० फुट रुंदीचा पक्का डांबरी रस्ता जोते भिंत (Retaining wall) व भूमिगत गटार इ. कामे करण्याकरिता** रक्कम **रु.२,१८,८०,९५५/- (रुपये दोन कोटी अठरा लाख ऐंशी हजार नऊशे पंचावन्न फक्त)** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींच्या अधिन राहून याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात हरकत नसावी :-

(१) ज्या भूखंडावर उक्त काम करावयाचे आहे, तो भूखंड गृह (पोलीस) विभाग, महाराष्ट्र शासन यांच्या नावे आहे याबाबत खात्री केल्यावरच काम सुरु करावे.

(२) बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुशास्त्र तज्ञाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

(३) उक्त कामासाठी **रु.२,१८,८०,९५५/-** इतक्या रकमेच्या मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशीक विभाग, मुंबई यांनी दिलेल्या, तांत्रिक मान्यतेनुसार अंदाजपत्रकासोबतच्या जोडपत्रातील, (Recapitulation Sheet) विवरणानुसार काम करावे.

(४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत विस्तृत खर्चाचे अंदाज मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

(५) प्रत्यक्ष काम करताना शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४, अनुसार कार्यवाही करण्यात यावी.

(६) शा.नि., सा.बां. विभाग, क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमा.-२, दिनांक ०७.०७.२०१७, अनुसार कार्यवाही करण्यात यावी.

(७) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करण्यात येऊ नये.

**५.** उक्त खर्च हा, गृह विभाग, "मागणी क्र.बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) (११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण साठी बांधकाम करणे (कार्यक्रम), ४०७००१५१, ५३, मोठी बांधकामे" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून, त्यासाठी उपलब्ध केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे शासन ज्ञापन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र.१, सार्वजनिक बांधकाम विभाग, नियम पुस्तीकेतील परि.क्र. १३४(१), १३४(२) व १३४(३) अनुसार शासन निर्णय वित्त विभाग दि.२०.९.२०१९ अन्वये प्रशासनिक विभागास प्राप्त अधिकारांत सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६१५१२२८०७८०२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ï¿¿HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, pseudonym=D53E4970DA18F4240576F3F34F92F7E069E6A52A, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2023.06.15 12:29:49 +05'30'

**( नारायण बिरा माने )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक, फोर्स वन, म.राज्य, मुंबई
३) मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, मुंबई
४) अधीक्षक अभियंता, मुंबई (सा.बा.) मंडळ, मुंबई
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) महा लेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

८) कार्यासन अधिकारी (इमा.-२), सा.बां. विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन अधिकारी (अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) कार्यकारी अभियंता, सा.बां.(उत्तर ) विभाग, मुंबई.
१२) निवड फाईल (पोल-७).